***शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून अनुसूचित जातीच्या उमेदवारांना व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना. (मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण)***

***महाराष्ट्र शासन***
*सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग*
*शासन निर्णय क्रमांक : ईबीसी २००३/प्र.क्र.१८८/मावक २*
*मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.*
***दिनांक :- ४ जुलै, २००३.***

***प्रस्तावना :-*** *देशात औद्योगिक व आर्थिक उदारीकरणाचे धोरण स्वीकारल्यामुळे राष्ट्रीय उद्योग व खाजगी उद्योगामध्ये मोठया प्रमाणावर मंदीची लाट आलेली आहे. त्यामुळे उद्योग क्षेत्रातील मनुष्यबळाची गरज अत्यंत कमी झालेली आहे. याचा परिणाम म्हणून समाजातील बेरोजगार उमेदवारांच्या संख्येत मोठया प्रमाणात भर पडलेली असून, त्यामध्ये एस.एस.सी उत्तीर्ण, अनुत्तीर्ण व आर्थिक दुर्बलतेमुळे पुढील कोणतेही शिक्षण न घेवू शकलेले बेरोजगार यांचा समावेश आहे. या प्रश्नाचे गांभीर्य ओळखून शासनाने औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये रोजगार व व्यवसायाभिमुख अल्पावधीचे अभ्यासक्रम व लोकसेवा केंद्र स्थापन करण्याचा निर्णय दिनांक १५ जुलै, २००२ रोजी घेतला आहे व त्या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. या शासन निर्णयामुळे रोजगार व स्वयंरोजगार विभागाने स्वीकारलेल्या धोरणाला निश्चितच चालना मिळते आहे.*

*राज्यातील अल्पशिक्षित अनुसूचित जातीमधील उमेदवारांना औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये उपलब्ध असलेल्या प्रशिक्षण सुविधांचा व साधनसामुग्रींचा यथायोग्य वापर करुन अल्प कालावधीचे प्रशिक्षण देऊन या प्रशिक्षित उमेदवारांना स्वयंरोजगार मिळवून देण्यासाठी व सेवाविषयक कामे करण्याची संधी मिळावी ही बाब विचाराधीन होती.*

***शासन निर्णय :-*** *वरील सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन शासन आता खालीलप्रमाणे अनुसूचित जातीच्या उमेदवारांसाठी सोबतच्या परिशिष्ट - अ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती व परिशिष्ट - ब मध्ये नमूद केलेल्या अभ्यासक्रमास "शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था" मधून अनुसूचित जातीच्या उमेदवारांसाठी व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना ( मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण ) या योजनेस तसेच शासकीय वसतीगृहातील गट- क व गट - ड कर्मचारी व अनुदानित वसतीगृहातील अधिक्षक यांना या योजनेखाली प्रशिक्षण देण्याच्या योजनेस शासन मंजूरी देत आहे.*

*२. सदर योजना सन २००३-२००४ या आर्थिक वर्षापासून राबविण्यास शासन मान्यता देत आहे. याबाबतचा होणारा खर्च हा खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. तसेच संचालक, (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. यावरील तरतूद कमी अधिक करण्याचे अधिकार या दोघांना प्रदान करण्यात येत आहेत.*

*३. याबाबत होणारा खर्च "२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण, ८० सर्वसाधारण , १०२, स्वयंसेवी संस्थांना मदत, ८०० इतर खर्च , पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (विघयो) (०१) (०२) मागासवर्गीय विद्यार्थ्यांना व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना (मागेल त्याला व्यावसाय प्रशिक्षण) (२२२५ ३२५ १ ) ४१ सहाय्यक अनुदाने मागणी क्रमांक एन-४" या अर्थशीर्षाखाली खर्ची घालून त्याखाली करण्यात आलेल्या चालू आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.*

४.    हा शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक५०८/०३/व्यय-१४, दिनांक २१/६/०३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**( नं. मा. शिलवंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
सचिव, नियोजन विभाग.
प्रधान सचिव, वित्त विभाग.
सचिव, ग्राम विकास विभाग.
सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग.
सर्व मंत्रालयीन विभाग.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, उच्च व तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व उपसंचालक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग.
सर्व उपसंचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालये.
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
सर्व कोषागार अधिकारी
निवड नस्ती मावक २.

# परिशिष्ट - अ

**शासन निर्णय क्रमांक : इबीसी-२००३/प्र.क्र.१८८/मावक २,दिनांक ४ जुलै, २००३ चे सहपत्र**

***शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून अनुसूचित जातीच्या उमेदवारांना व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना ( मागेल त्याला व्यवसाय प्रशिक्षण ) राबविण्याबाबत नियमावली***

***अ) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील प्रशिक्षणाचे आयोजन :-***

*१. राज्यात एकंदर ३४७ औद्योगिक प्रशिक्षण संस्था कार्यरत आहेत या सर्व संस्थांमध्ये मागेल त्या अनुसूचित जातीमधील उमेदवारांना प्रशिक्षण देणे याकरीता ही योजना राबविण्यात येईल.*

*२. संबंधित संस्थेत जे व्यवसाय शिकविले जातात आणि ज्या व्यवसायांच्या प्रशिक्षण सुविधा उपलब्ध आहेत त्या अनुषंगिक त्या संबंधित किंवा संलग्न व्यवसायाचे प्रशिक्षण आयोजित करण्यात येईल.*

*३. सदरचे प्रशिक्षण हे औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील नियमित प्रशिक्षणच्या वेळेनंतर दररोज ४ तास किंवा सुट्टीच्या दिवशी आयोजित केले जाईल.*

*४. खाजगी औद्योगिक आस्थापना, शासकीय व निमशासकीय कार्यालये यांच्या गरजेप्रमाणे व स्थानिक गरजेनुसार स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध आहे अशा व्यवसायानुरुप सर्व अल्प मुदतीचे प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यात येतील. सदर प्रशिक्षण हे उत्पादनाभिमुख प्रशिक्षण योजनेतील मार्गदर्शक तत्वाच्या आधारे आयोजित केले जाईल व या प्रशिक्षण कामासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचे प्राचार्य समन्वयक म्हणून काम पाहतील व त्यांना संस्थेतील व्यवसाय अभ्यासक्रमा व्यतिरिक्त इतर सुविधा करण्याची व मानधनावर तज्ञ निदेशक / अनुभवी व्यक्ती नेमण्याची परवानगी राहील.*

***ब) +२ स्तरावरील केंद्र शासन पुरस्कृत अभ्यासक्रमाचे शासकीय व अनुदानित संस्थेत प्रशिक्षणाचे आयोजन :-***

*औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये ज्या व्यवसायाच्या प्रशिक्षणाची सुविधा नाही अशा वाणिज्य, कृषि, अर्धवैदयकीय, मत्स्य, अन्न इत्यादी गटातील व्यवसायामधील प्रशिक्षण देण्यासाठी +२ स्तरावरील केंद्र शासन पुरस्कृत योजना राबविणा-या संस्थामध्ये ज्या ज्या व्यवसायाच्या सुविधा उपलब्ध असतील त्या अनुषंगिक व त्या संबंधित व्यवसायातील किंवा संलग्न व्यवसायातील अल्प मुदतीचे प्रशिक्षण आयोजित करता येईल.*

***क) शासकीय तांत्रिक विद्यालयात प्रशिक्षणाची योजना :-***

*१. राज्यातील सर्व १२० शासकीय तांत्रिक विद्यालयातून या प्रशिक्षणाचे आयोजन करण्यात येईल.*

*२. उपरोक्त सर्व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, +२ स्तरावरील केंद्र शासन पुरस्कृत अभ्यासक्रमाच्या शासकीय व अनुदानित संस्थांमधील साधनसामग्रीचा तसेच आवश्यकतेनुसार ए.व्ही.टी.एस. मधील साधनसामग्रीचा विनियोग करुन राबवावयाची आहे. प्रत्येक प्रशिक्षण कार्यक्रमाच्या शेवटी २ दिवसाचे उद्योजकता प्रशिक्षण मिटकॉन / एम.सी.ई.डी.यांच्या मार्फत देण्यात येईल. तसेच सदर प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर प्रशिक्षित उमेदवारांना सेवाउद्योग सुरु करण्यासाठी आवश्यकतेप्रमाणे टूलकिटचा एक संच किंमत अंदाजे रु.१०००/- पर्यंतच्या मर्यादेत देण्यात येइल. जेणेकरुन अशा प्रशिक्षणामुळे ते स्वत:च्या पायावर उभे राहून स्वयंरोजगार करु शकतील.*

***ड) मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण या योजनेची कार्यपध्दती :-***

*१. मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण या योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या प्रशिक्षण कार्यक्रमाची यादी सोबत परिशिष्ट- "ब" प्रमाणे राहील. सोबतची यादी उदाहरणादाखल दिलेली असून त्या*

*व्यतिरिक्त स्थानिक गरजांची मागणी, बाजारपेठेची मागणी इ. लक्षात घेऊन व व्यावसायिक शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया अंतर्गत असणा-या संस्थांमधील उपलब्ध साधनसामग्री यांचा उपयोग करुन जादाचे अभ्यासक्रम ठरविण्यात येतील किंवा विद्यमान अभ्याक्रमामध्ये सुधारणा करता येईल.*

*२. या योजने अंतर्गत दयावयाच्या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी उमेदवाराची निवड औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचे प्राचार्य व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांच्या मार्फत करुन उमेदवारांना प्रशिक्षणासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत पाठविण्यात येईल. हे प्रशिक्षण सरासरी अंदाजे २०,००० उमेदवारांना दयावयाचे असून, या प्रयोजनार्थ प्रत्येक प्रशिक्षणार्थ्यामागे सरासरी रु.२५००/- इतका खर्च येणार आहे. सदर खर्चामध्ये प्रशिक्षकाचे मानधन, कच्च्या मालावरील खर्च, कार्यालयीन खर्च, टूलकिट संच, विद्यावेतन व इतर खर्चाचा समावेश असेल. या खर्चाचा तपशिल संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी निश्चित करावा. सदर प्रशिक्षण अभ्यासक्रम राबविण्यासाठी संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई व संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी निर्धारीत केलेले प्रशिक्षण शुल्क संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्थेकडे प्रशिक्षण सुरु होण्यापूर्वी आगाऊ वर्ग करावे.*

*३. उपरोक्त शुल्कामध्ये दोन दिवसांचा उद्योजकता प्रशिक्षण कार्यक्रम एम.सी.ई.डी. / मिटकॉन यांच्यामार्फत आयोजित करण्यात येतील. प्रशिक्षणा करीता दर प्रशिक्षणार्थ्याच्या मागे रु.४०/- एवढया प्रशिक्षण शुल्काचा समावेश आहे. मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण या योजनेंतर्गत सेवा संवर्गातील प्रशिक्षण अभ्यासक्रमाकरीता प्रति प्रशिक्षणार्थी टूलकिट्स प्रत्येक उमेदवाराला देण्यात येईल व या टूलकिटमध्ये समाविष्ट करावयाच्या उपकरणांची निश्चिती राज्यस्तरावरुन संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे, संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई व संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी करावयाची असून खरेदीची कार्यवाही संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी करुन एकत्रित संच संबंधित संस्था प्राचार्याकडे विहित मुदतीत प्रशिक्षणार्थ्यांना वाटपासाठी वर्ग करावेत. योजने अंतर्गत प्रत्येक उमेदवाराला सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभागाने ठरवून दिलेल्या नियमांप्रमाणे प्रशिक्षण कालावधीत प्रति महिना रु.१००/- व त्याप्रमाणात कमी अधिक कालावधीसाठी विद्यावेतन देण्यात येईल. त्याचप्रमाणे विद्यावेतन वाटपाची जबाबदारी संबंधित संस्थेचे प्राचार्य यांची राहील. सदर अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर उमेदवाराची परीक्षा घेण्यात येईल व त्यांना औद्योगिक प्रशिक्षण संस्थेद्वारे प्रमाणपत्र देण्यात येईल. या अभ्यासक्रमांतर्गत उत्तीर्ण उमेदवारांना औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये स्थापन केलेल्या लोकसेवा केंद्रा अंतर्गत सामाजिक सुविधा केंद्रात काम करण्याची मुभा देण्यात येईल.*

*४. या योजनेचे दैनंदिन पर्यवेक्षण औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे उपप्राचार्य किंवा संस्थेतील एका गट निदेशकाकडे व शासकीय तांत्रिक माध्यमिक शाळेबाबत पूर्णवेळ शिक्षक/सहाय्यक शिक्षक यांचेकडे सोपविण्यात येईल. परंतु नियंत्रणाची पूर्ण जबाबदारी संबंधित प्राचार्यांची / मुख्याध्यापकांची राहील. या अभ्यासक्रमांतर्गत जमा होणारे शुल्क याची विभागणी, खर्च इ. तपशिलाची वेळोवेळी नोंदवहीत नोंद करणे बंधनकारक असून त्याबाबतची तपासणी प्राचार्यांनी वेळोवेळी करावी. या योजनेंतर्गत करण्यात येणा-या कार्यवाहीचा आढावा उपसंचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालयाने*

*दर तीन महिन्यांनी घेऊन त्यांचा एकत्रित अहवाल वेळोवळी संचालक (प्रशिक्षण ), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांना सादर करावा व त्यांनी एकत्रितपणे अहवाल संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावा.*

५. *या योजनेस विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांनी त्यांच्या जिल्हयामध्ये सर्व स्तरावर व्यापक प्रसिध्दी द्यावी या योजनेच्या प्रसिध्दीसाठी रक्कम मंजूर करण्याचे अधिकार संचालक, समाजकल्याण, पुणे यांना देण्यात येत आहे.*

------

## परिशिष्ट "ब"

**शासन निर्णय क्रमांक : इबीसी-२००३/प्र.क्र.१८८/मावक २,दिनांक ४ जुलै, २००३ चे सहपत्र**

***शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून अनुसूचित जातीच्या उमेदवारांना व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना ( मागेल त्याला व्यवसाय प्रशिक्षण ) राबविण्याबाबत नियमावली***

| अ. क्र. | अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यासक्रमाचा तपशील | प्रशिक्षण कालावधी | शैक्षणिक अर्हता | प्रशिक्षण शुल्काचे दर |
|---|---|---|---|---|---|
| | **मशिन शॉप ग्रुप** | | | | **(रुपयै)** |
| १ | सीएनसी लेथ ऑपरेटर | मशिनला दिलेल्या कॉम्युटर प्रोग्रॅम प्रमाणे मशिनवर जॉबचे उत्पादन करणे | २ महिने | आय.टी. आय.टर्नर पास किंवा एस.एस.सी. पास व दोन वर्ष टर्नरचा अनुभव, अथवा अभियांत्रिकी पदवी किंवा पदविका पास | २,००० |
| २ | सीएनसी प्रोग्रॅमर ( लेथ) | जॉब ड्राईगप्रमाणे प्रोग्रॅम तयार करणे | १ महिना | सी.एन.सी. लेथ ऑपरेटर पास किंवा अभियांत्रिकी पदवी किंवा पदविका पास | १,००० |
| ३ | सीएनसी ऑपरेटर (मिलिंग) | मशिनला दिलेल्या कॉम्प्यूटर प्रोग्राम प्रमाणे मशिनवर जॉबचे उत्पादन करणे | २ महिने | आय.टी.आय. मशिनिष्ट / ग्राईंडर पास किंवा एस.एस.सी पास व मशिनिष्ट / ग्राईंडर चा दोन वर्ष अनुभव किंवा अभियांत्रिकी पदवी किंवा पदविका पास | २,००० |
| ४ | सीएनसी प्रोग्रॅमर (मिलींग) | जॉब ड्राईगप्रमाणे प्रोग्रॅम तयार करणे | १ महिना | सी.एन.सी. ऑपरेटर (मीलींग) पास किंवा अभियांत्रिकी पदवी किंवा पदविकास पास | १,००० |
| | **मेटल वर्कींग ग्रुप** | | | | |
| ५ | गॅस / आर्क वेल्डींग / फॅब्रिकेशन वर्क | सर्व प्रकारच्या लोखंडी वस्तु तयार करणे | २ महिने | ८ वी पास | २,००० |
| ६ | बेझिंग ॲण्ड सोल्ड्रींग | तांबे, पितळ, धातूच्या वस्तूंचे तुटलेले भाग सोल्ड्रींग करुन जोडणे. | २ आठवडे | ४ थी पास | ६०० |
| | **इलेक्ट्रिक ट्रेड ग्रुप** | | | | |
| ७ | घरगुती वायरिंग | नवीन घराचे /ब्लॉकचे इलेक्ट्रिक वायरिंग करणे, लाईट, फॅन, गीझरचे वायरिंग दुरुस्ती करणे. | २ आठवडे | ८ वी पास | ६०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८ | घरगुती विद्युत उपकरणांची दुरुस्ती | पंखे, इस्त्री, गीझर, मिक्सर इत्यादी साधनांची दुरुस्ती करणे | २ आठवडे | ८ वी पास | ६०० |
| ९ | मोटर आर्मेचर वाईंडिंग | वॉशिग मशिन, फ्रीज, मिक्सर, पंपसेट च्या इलेक्ट्रिक मोटरचे रिवाईडिंग करणे. | १ महिना | ८ वी पास | १,००० |
| १० | इलेक्ट्रिकल वॉटर पंप रिपेरिंग ॲण्ड वायरिंग | पाण्याच्या पंपाचे वायरिंग करणे, दुरुस्ती करणे | १ महिना | ८ वी पास | १,००० |
| | **बिल्डींग ॲण्ड फर्निचर ट्रेड ग्रुप** | | | | |
| ११ | वीट बांधकाम व प्लॅस्टरिंग | नविन बांधकामात वीट बांधकाम, प्लॅस्टरिंग करणे, जुने बांधकाम दुरुस्ती किंवा वाढीव बांधकाम करणे. | १ महिना | ४ थी पास | १,००० |
| १२ | टाईल्स फिटींग व पॉलिशिंग | मोझॅक टाईल्स, ग्लेझ टाईल्स बसविणे, पॉलिशिंग करणे. | २ आठवडें | ४ थी पास | ६०० |
| १३ | किचन ओटा बनविणे / सिंक बसविणे | नविन किचन ओटा, कडप्पा किंवा ग्रेनाईट बसविणे, किचन सिंक बसविणे, दुरुस्तीची कामे | १ आठवडा | ४ थी पास | ४०० |
| १४ | आर.सी.सी. मोल्डेड बांधकामाचे साहित्य बनविणे | सिमेंटच्या विटा, ग्रील फेन्सिंग पोल इ.तयार करणे | १ आठवडा | ४ थी पास | ४०० |
| १५ | बांधकामासाठी लागणा-या खिडक्या दरवाजे तयार करणे | इमारत बांधकामासाठी लाकडी खिडक्या , दरवाजे तयार करणे. | २ आठवडे | ४ थी पास | ६०० |
| १६ | घराचे लाईट , पंखे, गीझरचे  वायरिंग ची दुरुस्ती करणे. | घरगुती वापरासाठी, कार्यालयासाठी लागणारे विविध फर्निचर बनविणे | १ महिना | ८ वी पास | १,००० |
| १७ | कारपेंट्री लेथ मशिनवर फर्निचरसाठी लागणारे साहित्य तयार करणे | लाकडी फर्निचरमध्ये खुर्च्या, टिपॉयचे पाय, मंदिराचे मकर करण्यासाठी नक्षीकामाचे खांब बनविणे. | २ आठवडे | ८ वी पास | ६०० |
| १८ | ॲल्यूमिनियम | ॲल्यूमिनियम फ्रेममध्ये | १ आठवडा | ८ वी पास | ४०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | स्लायडिंग खिडक्या / दरवाजे बनविणे | स्लाईडिंग ग्लासचे खिडक्यांचे दरवाजे, संडास बाथरुमचे दरवाजे तयार करणे. | | | |
| १९ | घरगुती पाण्याचे नळाचे प्लबिंग काम | नवीन इमारतीचे पाण्याच्या पाईपची जोडणी करणे व विविध प्रकारचे कॉक , टॅब बसविणे. | १ आठवडा | ४ थी पास | ४०० |
| २० | सॅनिटरी वेअर्सचे फिटींग व प्लबिंग | वॉश बेशिन संडासची भांडी बसविणे. | २ आठवडे | ४ थी पास | ६०० |
| २१ | ड्रेनेज लाईन फिटींग व प्लबिंग | इमारतीची ड्रेनेजची पाईप लाईन बसविणे | २ आठवडे | ४ थी पास | ६०० |
| | **मेन्टेनन्स ट्रेड ग्रुप** | | | | |
| | जनरल मेकॅनिक | | | | |
| २२ | रिपेअर्स ऑफ सुईग मशिन | सर्व प्रकारच्या शिलाई मशिनची दुरुस्ती करणे | १ आठवडा | ४ थी पास | १,००० |
| २३ | रिपेअर्स ऑफ बायसिकल | सायकल दुरुस्तीचे काम | १ आठवडा | ४ थी पास | १,००० |
| २४ | रिपेअर्स ऑफ गॅस स्टोव्ह/ केरोसिन स्टोव्ह पेट्रोमॅक्स | गॅस शेगडी, रॉकलचा स्टोव्ह, पेट्रोमॅक्स इ. साधनांची दुरुस्ती करणे. | १ आठवडा | ४ थी पास | १,००० |
| २५ | जनरल फिटींग शॉप प्रॅक्टिस | घरगुती वापरातील शेतीकामातील लहान हत्यारे, अवजारांची दुरुस्ती करणे. | १ आठवडा | ४ थी पास | १,००० |
| | **इन्स्ट्रुमेंट ट्रेड ग्रुप** | | | | |
| २६ | वॉटर मिटरची कॉलिब्रेशन व दुरुस्ती | पाण्याचे मीटर | १ आठवडा | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| २७ | टॅक्सी मिटरची कॉलिब्रेशन व दुरुस्ती | टॅक्सीचे मीटर | १ आठवडा | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| २८ | एनर्जी मिटरची कॉलिब्रेशन व दुरुस्ती | विदयुत मापक इत्यादी ची दुरुस्ती करणे. | १ आठवडा | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| २९ | क्वॉर्झ घडयाळांची दुरुस्ती | इलेक्ट्रिक घडयाळ दुरुस्ती करणे | १ आठवडा | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| | **रेफ्रीजरेशन ॲण्ड** | | | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | **एअर कडिंशन ग्रुप** | | | | |
| ३० | रेफ्रीजरेटर मेकॅनिक | घरगुती व व्यावसायिक वापरातील रेफ्रीजरेटरची दुरुस्ती करणे. | २ आठवडे | एस.एस.सी. पास / नापास | ६०० |
| ३१ | एअरकंडिशन मॅकॅनिक | घरगुती व व्यावसायिक वापरातील वातानुकुलीकरण | १ महिना | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| ३२ | एसी कार रिपेअरिंग | मोटार वाहनातील वातानुकुलीकरण यंत्र दुरुस्ती करणे | २ आठवडे | एस.एस.सी. पास / नापास | ६०० |
| ३३ | वॉटर कुलर/ बॉटल कुलर/ आईस कॅन्डी इ. सर्व्हीसिंग ॲण्ड मेन्टनन्स | हॉटेल आईस्क्रिम कोल्ड्रींग हाऊस , पार्लर मध्ये वापरण्यात येणारी वॉटर कुलर, बॉटल कुलर डिप फ्रीजर इ. उपकरणांची दुरुस्ती करणे. | २ आठवडे | एस.एस.सी. पास / नापास | ६०० |
| | **हिट इंजिन ट्रेड ग्रुप** | | | | |
| ३४ | थ्रीव्हिलर ड्रायव्हिंग | रिक्षा चालविण्याचे प्रशिक्षण | १ महिना | ४ थी पास | १,००० |
| ३५ | कार ड्रायव्हिंग | मोटार वाहन चालविण्याचे प्रशिक्षण | १ महिना | ४ थी पास | १,००० |
| ३६ | जीप ड्रायव्हिंग | जीप चालविण्याचे प्रशिक्षण | १ महिना | ४ थी पास | १,००० |
| ३७ | ट्रक / बस ड्रायव्हिंग | अवजड वाहने (ट्रक) चालविण्याचे प्रशिक्षण | १ महिना | ४ थी पास | १,००० |
| ३८ | स्कुटर / मोटर सायकल रिपेअरिंग | स्कुटर / मोटर सायकल दुरुस्ती | २ महिने | ८ वी पास | २,००० |
| ३९ | व्हेईकल इंजिन रिपेरिंग | मोटर वाहनाच्या इंजिनची दुरुस्ती | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| ४० | सर्व्हीसिंग ऑफ ऑल टाईप ऑफ व्हेईकल्स | सर्व प्रकारच्या वाहनांची दुरुस्ती | १ महिना | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| ४१ | डेनटिंग / पेटिंग / बॉडी रिपेअरिंग | वाहनांची दबलेले पत्रे गंजलेले पत्रे ठोकून सरळ करणे /बदलणे व पेंटिंग करणे | १ महिना | ४ थी पास | १,००० |
| ४२ | ट्रॅक्टर ड्राईव्हिंग | ट्रॅक्टर चालविण्याचे | १ महिना | ४ थी पास | १,००० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | प्रशिक्षण | | | |
| ४३ | ट्रॅक्टर रिपेरिंग | ट्रॅक्टर दुरुस्ती | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ४४ | डिझेल पेट्रोल जनरेटर सेट रिपेरिंग | डिझेल व पेट्रोल जनरेटर ची दुरुस्ती | १ महिना | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| ४५ | डिझेल वॉटर पंप रिपेरिंग | डिझेलवर चालणाऱ्या पंपाची दुरुस्ती | १ महिना | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| | **ड्राफ्ट्समन सर्वे ट्रेड ग्रुप** | | | | |
| ४६ | कॅड/ कॅम | कॅड/कॅम सॉफटवेअर वापरुन ड्रॉफटींग करणे. | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| | **प्रिंटिंग ट्रेड ग्रुप** | | | | |
| ४७ | डिटीपी व पेज सेटिंग | छपाईचा मसुदा कॉम्प्युटरवर कंपोझ करणे | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ४८ | ऑफसेट प्रिटींग | ऑफसेट मशिनवर प्रिटींगचे काम | १ महिना | एस.एस.सी. पास / नापास | १,००० |
| ४९ | बुक बायडिंग | रजिष्टर, रिसिटबुक, जुनी पुस्तके बाईडिंग करणे | २ आठवडे | ४ थी पास | ६०० |
| | **कटिंग ॲण्ड टेंलरिंग ट्रेड ग्रुप** | | | | |
| ५० | स्त्रियांचे कपडे शिवणे | ब्लाऊज , पेटीकोट इ. स्त्रियांचे कपडे शिवणे | १ महिना | ८ वी पास | १,००० |
| ५१ | पुरुषांचे कपडे शिवणे | शर्ट, पँट, टी शर्टस् इ. पुरुषांचे कपडे शिवणे | १ महिना | ८ वी पास | १,००० |
| ५२ | मुलांचे कपडे शिवणे | लहान मुलांचे विविध प्रकारचे कपडे शिवणे | १ महिना | ८ वी पास | १,००० |
| ५३ | गृहपयोगी कलात्मक वस्तु तयार करणे | उषाचे अंभ्रे , बैठकीचे लोड कव्हर, वॉल पिसेस शिवणे | १ महिना | ४ थी पास | १,००० |
| ५४ | फॉजलबिडींग व एम्ब्रायडरी करणे | साडीचे फॉल, बिडींग, स्त्रीयांच्या कपडयांवर एम्ब्रायडरी करणे | १ महिना | ४ थी पास | १,००० |
| | **इलेक्ट्रॉनिक्स ट्रेड ग्रुप** | | १ महिना | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५५ | रेडियो/ऑडियो सिस्टिम दुरुस्ती | ट्रान्झीस्टर, टेप, स्टीरीओ रेकॉर्डप्लेअर दुरुस्ती | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ५६ | टी.व्ही. सर्व्हीसिंग | कलर टि.व्ही. दुरुस्ती | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ५७ | सीडी प्लेअर दुरुस्ती | सीडी , व्हीसीडी प्लेअर दुरुस्ती | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ५८ | घरगुती इलेक्ट्रॉनिक्स वस्तुंची दुरुस्ती | वॉशिग मशिन, ओव्हन ज्यामध्ये इलेक्ट्रानिक सर्किट आहे अशा साधनांची दुरुस्ती | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ५९ | फॅक्स व झेरॉक्स मशिनची दुरुस्ती | फॅक्स व झेरॉक्स दुरुस्ती | २ आठवडे | एस.एस.सी. पास / नापास | ६०० |
| ६० | मोबाईल फोन दुरुस्ती | मोबाईल फोन दुरुस्ती | २ आठवडे | एस.एस.सी. पास / नापास | ६०० |
| | **कॉम्प्युटर ट्रेड ग्रुप** | | | | |
| ६१ | टॅली ऑपरेशन | टॅली अकौंटिंग सॉफ्टवेअरचा वापर करणे | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ६२ | फॅक्सप्रो प्रोग्रॅमिंग | फॅक्सप्रो प्रोगॅमिंग करणे | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ६३ | इंटरनेट ई- मेल | इंटरनेट ई-मेलचा वापर करण्याचे प्रशिक्षण | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ६४ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | डाटा एन्ट्रीसाठी आवश्यक संगणक प्रशिक्षण | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,००० |
| ६५ | व्हिजुअल बेसिक प्रोग्रॅमिंग | व्हिजुअल बेसिक प्रोग्रॅमिंग शिकणे | २ महिने | १२ वी पास | २,००० |
| ६६ | सी प्रोग्रॅमिंग | सी प्रोग्रॅमिंग शिकणे | २ महिने | १२ वी पास | २,००० |
| ६७ | हार्डवेअर ॲण्ड नेट वर्किंग | हार्डवेअर ॲण्ड नेट वर्कीग शिक्षण | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,४०० |
| ६८ | हार्ड वेअर मेन्टनन्स | कॉम्प्यूटर हार्डवेअर दुरुस्तीचे शिक्षण | २ महिने | एस.एस.सी. पास / नापास | २,४०० |